**सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ कार्यालयातील नियमित आस्थापनेवरील गट-ड म्हणून घोषित केलेल्या सर्व पदांना गट-क संवर्गात पदोन्नती देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकिर्ण-२०१९/प्र.क्र.३२ /सेवा-४,**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- २३ ऑक्टोबर, २०२०.

<u>वाचा:</u> १) सा. प्र. वि., शासन अधिसूचना क्र. आरटीआर २०१४/प्र.क्र.३२२/का.१२ दि. ०६ जून, २०१७.
२) सा. प्र. वि, शासन अधिसूचना क्र. आरटीआर २०१४/प्र.क्र.३५५/का.१२ दि. ०६ जून, २०१७.
३) सा. प्र. वि, शासन अधिसूचना क्र. आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३/का.१४-अ, दि. २१ फेब्रुवारी, २०१८.
४) सा. प्र. वि, शासन अधिसूचना क्र. आरटीआर २०१७/प्र.क्र.३६६/का.१२ दि. ११ जून, २०१९.
५) सा. प्र. वि, शासन अधिसूचना क्र. आरटीआर १०१३/प्र.क्र.५०/१३/१४-अ, दि. २३ जानेवारी, २०२०.

**<u>प्रस्तावना-</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयातील गट-ड संवर्गात ३ वर्षे सेवा पूर्ण केलेल्या, विहित शैक्षणिक अर्हता धारण केलेल्या तसेच मराठी-इंग्रजी टंकलेखनाची विहित परिक्षा उत्तीर्ण केलेल्या कर्मचा-यांचे गट-क संवर्गामध्ये पदोन्नती देण्याबाबतचे विनंती अर्ज शासनास प्राप्त झाले आहेत. प्राप्त विनंती अर्जाच्या अनुषंगाने क्र.संकीर्ण-२०१९/प्र.क्र.३२ /सेवा-४, दि. ०४ डिसेंबर, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयातील नियमित आस्थापनेवरील “गट-ड” म्हणून घोषित केलेल्या सर्व पदांना “लिपिक-टंकलेखक/कनिष्ठ-लिपिक” या संवर्गात सामान्य प्रशासन विभागाच्या शासन अधिसूचना, क्र. आरटीआर २०१४/ प्र.क्र. ३५५/का.१२, दि. ६ जून, २०१७ अन्वये विहित केलेल्या पदोन्नती कोटयानुसार पदोन्नती देण्यास शासन मान्यता देण्यात आली. तथापि, सदर शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०१९/प्र.क्र.३२ /सेवा-४ दि. २२ ऑक्टोबर, २०१९ रोजीच्या निर्णयान्वये रद्द करण्यात आला आहे.

**<u>परिपत्रक-</u>**

सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयातील नियमित आस्थापनेवरील गट-ड म्हणून घोषित केलेल्या, सर्व पदांना सामान्य प्रशासन विभागाची, शासन अधिसूचना क्रमांक:एसआरव्ही २०१४/प्र.क्र.३२२/का.१२ दिनांक ६ जून, २०१७ लागू आहे.

२. बृहन्मुंबईबाहेरील महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कार्यकक्षेत नसलेल्या शासकीय कार्यालयातील “लिपिक-टंकलेखक”, गट क वर्गातील पदासाठी दिनांक ०६ जून, २०१७ च्या अधिसूचनेन्वये “गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१७” विहित करण्यात आलेले आहेत. दि. ०६ जून, २०१७ रोजीच्या अधिसूचनेत, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्र.४ येथील दि. ११ जून, २०१९ रोजीच्या अधिसूचनेन्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ बृहन्मुंबई बाहेरील क्षेत्रीय कार्यालयातील नियमित आस्थापनेवरील गट-ड म्हणून घोषित केलेल्या सर्व पदांना लिपिक-टंकलेखक, कनिष्ठ लिपिक या पदावरील पदोन्नतीसाठी उक्त अधिसूचनेत विहित केलेल्या तरतूदी लागू आहेत.

३. बृहन्मुंबईतील शासकीय कार्यालयातील “लिपिक-टंकलेखक”, गट क वर्गातील पदासाठी दिनांक २१ फेब्रुवारी, २०१८ च्या अधिसूचनेन्वये (संदर्भ क्र. ३ ) “गट-क (सेवाप्रवेश) नियम, २०१८” विहित करण्यात आलेले आहेत. दि. २१ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या अधिसूचनेत, सामान्य प्रशासन विभाग, संदर्भ क्र.५ येथील दि. २३ जानेवारी, २०२० रोजीच्या अधिसूचनेन्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ बृहन्मुंबईतील क्षेत्रीय कार्यालयातील नियमित आस्थापनेवरील गट-ड म्हणून घोषित केलेल्या सर्व पदांना लिपिक-टंकलेखक, कनिष्ठ लिपिक या पदावरील पदोन्नतीसाठी उक्त अधिसूचनेत विहित केलेल्या तरतूदी लागू आहेत.

४. सामान्य प्रशासन विभागाचे लिपिक-टंकलेखक संवर्गाचे तसेच गट-ड संवर्गाचे उपरोक्त सेवाप्रवेश नियम सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अधिनस्थ कार्यालयांना लागू होत असून, भविष्यातही सामान्य प्रशासन विभागामार्फत लिपिक-टंकलेखक संवर्ग तसेच गट-ड संवर्गातील पदांचे सेवाप्रवेश नियमाबाबत जे जे सुधारित आदेश निर्गमित होतील , ते ते आदेश त्या त्या वेळी या विभागाच्या अधिनस्थ कार्यालयांना आपोआप लागू होतील, याची नोंद घेण्यात यावी.

५. सदर परिपत्रक, सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४८८६/का.१२, दिनांक १८/०९/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आले असून, त्याचा संगणक सांकेतांक २०२०१०२३१३२६५८२७१८ असा आहे. सदर परिपत्रक, डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

VAISHALI MANISH SULE

Digitally signed by VAISHALI MANISH SULE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0e39186eb174ffc2d5d67d71804bf385073457ed3186970cc74a272f3074c496, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=cacc4e5906a45e67bca76eac2f10992fbf69020ed4ea4e45fa58b2a72eef683f, ou=PUBLIC WORKS, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VAISHALI MANISH SULE
Date: 2020.10.23 12:46:46 +05'30'

**( वैशाली सुळे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव(सा.बां.वि.), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२,
२) सचिव(रस्ते), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई-३२,
३) सचिव(बांधकामे), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-३२,
४) महालेखापाल-१/२(लेखापरिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
५) महालेखापाल-१/२(लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/नागपूर,
६) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग,
(मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती),
७) मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
८) मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग,मुंबई,
९) मुख्य अभियंता, राष्ट्रीय महामार्ग, नवी मुंबई,
१०) सर्व सहसचिव व उपसचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई
११) अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), मुंबई,
१२) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम परिमंडळे,
(मुंबई/पुणे/नाशिक/नागपूर/औरंगाबाद/अमरावती)
१३) सर्व अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळे,

१४) संचालक, उपवने व उद्याने, मुंबई,
१५) कार्यासन-१२,सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई,
१६) प्रशासन-१ /रो.आ.१/रो.आ.२ कार्यासने, सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय,मुंबई,
१७) कार्यासन (सेवा-४), निवडनस्ती.